अर्हतारहित आवेक्षक (अर्हतारहित कनिष्ठ अभियंता) यांच्या उपविभागीय अधिकारी पदावरील पदोन्नतीबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः सेप्रनि-२०१२/(१२३/२०१२)आ(संनि)
गोकुळदास तेजपाल रुग्णालय,लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २९ जानेवारी, २०१५

वाचा —

१) **शासन निर्णय क्रमांकः** पाटबंधारे आणि वीज विभाग, क्रमांक -जीएबी-१०७०-ई(१), दिनांक - १९ डिसेंबर, १९७०

२) **शासन निर्णय क्रमांकः** पाटबंधारे आणि वीज विभाग, क्रमांक-पीओजी-१०७१/३२३९- ई (१), दिनांक - २५ जानेवारी, १९७२

प्रस्तावना :-

शासनाच्या जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागातील महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग -१ व वर्ग-२ (गट-अ व गट-ब) मधील पदांवरील नियुक्तीबाबत संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील दि. १९.१२.१९७० च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या नियमावलीनुसार अर्हतारहित आवेक्षक, (अर्हतारहित कनिष्ठ अभियंता) उपविभागीय अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी पात्र ठरत नाहीत. तथापि, या संदर्भात दि. १९.१२.१९७० च्या शासन निर्णयातील नियम १३ (डी), १७ आणि २० मध्ये संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील दि. २५.१.१९७२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करुन, दि. १९.१२.१९७० पूर्वी अर्हतारहित आवेक्षक म्हणून ज्यांची आवेक्षक (कनिष्ठ अभियंता) पदावर नियुक्ती झालेली आहे व ज्यांनी त्या पदावर कमीत कमी १३ वर्षे समाधानकारक सेवा पूर्ण केलेली आहे व जे निवडसूचीमधील समावेशनासाठी आवश्यक असलेली अर्हता धारण करत असतील, त्यांचेसाठी उपविभागीय अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठी ५०% कोटयातील १०% पदे राखीव ठेवण्याची तरतूद करण्यात आलेली आहे.

अलिकडच्या काळात असे निदर्शनास आलेले आहे की, १९.१२.१९७० पूर्वी आवेक्षक (कनिष्ठ अभियंता) पदावर नियुक्ती झालेले कोणीही अर्हतारहित आवेक्षक (अर्हतारहित कनिष्ठ अभियंता) सध्या शासन सेवेत कार्यरत नाहीत. परिणामी त्या कोटयातील पदे रिक्त राहतात. या अर्हतारहित आवेक्षक (अर्हतारहित कनिष्ठ अभियंता) यांना उप विभागीय अधिकारी पदाच्या पदोन्नतीसाठी विहीत केलेल्या

कोटयातील १० टक्के पदे राखून ठेवण्याची तरतूद यापुढे चालू ठेवण्याची आवश्यकता दिसून येत नाही. त्यामुळे सदर तरतूद रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अर्हतारहित आवेक्षक (अर्हतारहित कनिष्ठ अभियंता) यांना उप विभागीय अधिकारी पदाच्या पदोन्नतीसाठी विहीत केलेल्या कोटयातील १० टक्के पदे राखून ठेवण्याबाबतच्या तरतूदीसंबंधीचा शासन निर्णय क्र पीओजी-१०७१/३२३९- ई (१), दिनांक - २५ जानेवारी, १९७२ याद्वारे रद्द करण्यात येत असून, यापुढे उपविभागीय अधिकारी या पदावर पदोन्नतीची मूळ ५० टक्के कोटयातील पदे पूर्णात: एकाच निम्न संवर्गातून म्हणजेच पदविकाधारक कनिष्ठ अभियंता यांच्यामधून विहीत पध्दतीने पदोन्नतीने भरण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने आणि सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५९४/का-१२, दिनांक २५.४.२०१४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२९१२१५४९४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajshekhar Chandrakant Patil

Digitally signed by Rajshekhar Chandrakant Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajshekhar Chandrakant Patil
Date: 2015.01.29 12:25:43 +05'30'

**( रा. चं. पाटील )**

शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

४) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन १२) मंत्रालय, मुंबई.

५) प्रधान सचिव, (जसंप्र व वि.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) सचिव, (जसंव्य व लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .

७) सचिव (बांधकामे )/ सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई-३२

८) महासंचालक, संकल्पन प्रशिक्षण व संशोधन, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक

९) महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.

१०) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व महामंडळांचे कार्यकारी संचालक.

११) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व मुख्य अभियंता/ अधीक्षक अभियंता / स्वीय सहाय्यक,

१३) मा. मंत्री (जलसंपदा) / मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव

१४) मा. राज्यमंत्री (जलसंपदा)/मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव.

१५) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम ) यांचे स्वीय सहायक .

१६) जलसंपदा विभागातील सर्व आस्थापना कार्यासने

१७) आ (संनि) कार्यासन संग्रहार्थ